जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ यांची कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
### शासन आदेश क्रमांकः एसएलएस-१११४/(५१६/२०१४)/आ (वर्ग-१)..(३)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
**तारीख: ०५ नोव्हेंबर, २०१५.**

**शासन आदेश :-**

जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर रुपये १५६००-३९१०० (ग्रेड पे ६६००) या सुधारित वेतनश्रेणीमध्ये सहायक कार्यकारी अभियंता या निम्न संवर्गातील उमेदवार पदोन्नतीसाठी उपलब्ध न झाल्याने, सहायक कार्यकारी अभियंता संवर्गाच्या कोट्यातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या, तदर्थ (Ad-hoc) व अभावित (Fortuitous) स्वरुपात महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव सर्वश्री. व प्रवर्ग | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | शंकर रामेश्वर मंडवार (इ.मा.व.) | सहायक अभियंता श्रेणी-१, भूविकास बांधकाम उपविभाग, हिंगणघाट ह.मु.रामटेक. | कार्यकारी अभियंता, निम्न वर्धा कालवे विभाग, वर्धा (पिंपरी). | रिक्त पदी. |
| २. | शिवाजी दिनकरराव जाधव (खुला) | सहायक अभियंता श्रेणी-१, अधीक्षक अभियंता, दक्षता पथक, पुणे अंतर्गत. | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, वाशिम. (बांधकाम) | रिक्त पदी. |
| ३. | मुकुंद शाम चौधरी (इ.मा.व.) | सहायक अभियंता श्रेणी-१, मुख्य अभियंता (जसं), उत्तर महाराष्ट्र प्रदेश कार्यालय, नाशिक अंतर्गत. | कार्यकारी अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव. | रिक्त पदी. |
| ४. | रविंद्र रामदास बानुबाकडे (इ.मा.व.) | सहायक अभियंता श्रेणी-१, लघु सिंचन (जलसंधारण) उपविभाग, वर्धा. | सहायक मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, नागपूर. | रिक्त पदी. |
| ५. | सुरेश हणमंत सावंत (खुला) | सहायक अभियंता श्रेणी-१, हेटवणे प्रकल्प उपविभाग क्र.१, उंबर्डे, पेण | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद, जळगांव | रिक्त पदी. |
| ६. | नंदकिशोर रामदास दळवी (इ.मा.व.) | सहायक अभियंता श्रेणी-१, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत. | कार्यकारी अभियंता, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर. | श्री.ज.ग.गवळी यांच्या अधीक्षक अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदी. |

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव सर्वश्री. व प्रवर्ग | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| ७. | सुर्यकांत मारुती नलवडे (खुला) | सहायक अभियंता श्रेणी-१, म्हैसाळ उपसा सिचंन व्यवस्थापन उपविभाग क्र.३, आरग. | कार्यकारी अभियंता, सीना कोळेगाव प्रकल्प विभाग, परांडा, जि.उस्मानाबाद. | रिक्त पदी. |
| ८. | शशिकांत विजय वाघमारे (अ.जा.) | उप कार्यकारी अभियंता, दूधगंगा कालवा विभाग क्र.१, कोल्हापूर. | कार्यकारी अभियंता, संकलचित्र विभाग, कालवा बांधकाम क्र.१, नाशिक. | रिक्त पदी. |

२. सदर पदोन्नती T.A.No.१/२०१४, T.A.No.२/२०१४ (रिट याचिका क्र.८४५२/२००४) संदर्भात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दि.२८.११.२०१४ रोजी दिलेल्या निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५, मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र.३९७१/२०१०, क्र.४२८४/२०१०, सिव्हील अप्लीकेशन क्र.९१६०/२०१०, अवमान याचिका क्र.२३८४५/२०१२ व २०९/२०१४ तसेच, मॅट, औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्र.५३१/२०१४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

३. अ.क्र.६ येथील श्री.नंदकिशोर रामदास दळवी यांना श्री.ज.ग.गवळी यांच्या अधीक्षक अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीने पदस्थापनेबाबतचे आदेश निर्गमित झाल्यानंतर श्री.दळवी यांना पदोन्नतीच्या पदी हजर होणेसाठी कार्यमुक्त करण्यात यावे.

४. वरील अधिकाऱ्यांची पदोन्नती ही सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून ज्येष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

५. सदर अधिकाऱ्यांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०१५ नुसार महसूली विभागाचे वाटप करण्यात आलेले आहे.

६. सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती ५०/५५ च्या वर्षाच्या पुनर्विलोकनाच्या निर्णयाच्या अधीन राहील.

७. सदर पदोन्नत अधिका-यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे/नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून १ महिन्याच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-१०८७/११३१/प्र.क्र.११/८९/बारा, दि.३०.०४.१९९१ मधील तरतूदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

८. पदोन्नती झालेल्या अधिका-यांनी पदग्रहण केल्यापासून १ महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्रमांक ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

९. संबंधित नियंत्रक अधिका-यास कळविण्यात येते की, पदोन्नत झालेल्या उप अभियंत्यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी त्वरीत कार्यमुक्त करावे. तसेच, पदोन्नती अभियंत्यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नियुक्तीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttlass१.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५११०५१७०००४०४२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2015.11.05 17:30:33 +05'30'

**(वि.का.चौधरी)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
२) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
५) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.
७) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
८) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
९) मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण), पुणे.
१०) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
११) सर्व अधीक्षक अभियता, लघु सिंचन (जलसंधारण) मंडळ.
१२) संबंधीत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१३) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.

१४) खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१५) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
१६) संबंधीत अधिकारी.
१७) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
२०) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.